**वन्यजीव शाखेमध्ये कार्यरत असलेल्या पशुवैद्यकीय अधिकारी (मंजूर पदे-०२) यांना जोखीम भत्ता मंजूर करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वनविभाग

**शासन निर्णय क्र.डब्ल्यूएलपी-०११८/प्र.क्र.१८/फ-१**

मंत्रालय,मुंबई-४०००३२

दिनांक:- २४ जानेवारी, २०१९

**वाचा** :-

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-२२(४)/आस्था/प्र.क्र.१०७/३२३/२०१७-१८, दिनांक २९/०४/२०१७.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-२२(४)/आस्था/प्र.क्र.१०८(१६-१७)/९४९/२०१८-१९, दिनांक १३/०६/२०१८.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्यामध्ये वन्यजीव (संरक्षण), अधिनियम १९७२ मधील तरतुदीनुसार वन्यप्राणी संरक्षण, संवर्धन करण्यात येत असल्यामुळे वन्यप्राण्यांच्या संख्येमध्ये वाढ झालेली आहे. मानव-वन्यप्राणी संर्घषाच्या घटना वनक्षेत्रात व मनुष्यवस्तीत घडत असतात. अशा घटनांमध्ये हस्तक्षेप करण्याकरिता वनविभागामार्फत शिघ्र बचाव पथक निर्माण करण्यात आलेले आहे. मुख्य वन्यजीव रक्षक तथा प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), नागपूर यांच्या आदेशानुसार वन्यप्राणी अडचणीत किंवा धोक्यात आल्याची सूचना मिळताच परिस्थितीवर नियंत्रण करण्यासाठी बचाव पथके काम करतात. सदर बचाव कार्यात बचाव पथकाचा सदस्य म्हणून पशुवैद्यकीय अधिकारी यांना जीविताची जोखीम घेवुन काम करावे लागते. बचाव कार्यादरम्यान साधारणता वाघ, बिबटे, अस्वले, हरण, चितळ, माकड व सर्प अश्या प्राण्यांना सामोरे जावे लागते अश्यावेळी कधीही अप्रिय घटना अथवा जीवित हानी होण्याची शक्यता आहे. महाराष्ट्र राज्यातील वनविभागातील संरक्षित क्षेत्र व राष्ट्रीय उद्यानातील कार्यरत असलेल्या पशु वैद्यकीय अधिकारी (मंजूर पदे-०२) यांना मुख्य वन्यजीव रक्षक तथा प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), नागपूर यांनी केलेल्या शिफारशीनुसार जोखीम भत्ता मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्यातील वनविभागातील संरक्षित क्षेत्र व राष्ट्रीय उद्यानातील कार्यरत असलेल्या पशु वैद्यकीय अधिकारी (मंजूर पदे-०२) यांना शासन निर्णय निर्गमित केल्याच्या दिनांकापासून प्रत्येकी रु.१.२० लक्ष प्रतिवर्ष एवढा जोखीम भत्ता देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

१) या प्रयोजनार्थ होणारा खर्च हा संजय गांधी राष्ट्रीय उद्यान, बोरीवली येथील ०१ पशु वैद्यकीय अधिकारी यांना संजय गांधी राष्ट्रीय उद्यानाच्या स्विय प्रपंच लेख्यातून (PLA) व अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पूर्व, नागपूर यांचे अधिनस्थ असलेले ०१ पशुवैद्यकीय अधिकारी यांना पेंच व्याघ्र संवर्धन प्रतिष्ठानाचे लेख्यातून भागविण्यात यावा.

२) सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.३४२/व्यय-१०, दिनांक ०२.०१.२०१९ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०१२४१७१८२५७५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sujay Dodal

Digitally signed by Sujay Dodal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=353112ee0fa47f9ff9bedae88f651d09fdb142df5fbce9c004f7eea06d8b9baf, cn=Sujay Dodal
Date: 2019.01.24 17:27:07 +05'30'

**( सुजय दोडल )**
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग

प्रत माहिती आणि उचित कार्यवाहीसाठी :-

१) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.राज्यमंत्री (वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
५) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) महासंचालक, माहिती व प्रसिध्दी, मंत्रालय, मुंबई.
७) प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
८) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
९) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक ( अर्थसंकल्प, नियोजन व विकास ), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१०) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) नागपूर/मुंबई.
११) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती
१२) मुख्य वनसंरक्षक व संचालक, संजय गांधी राष्ट्रीय उद्यान, बोरीवली
१३) मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, पेंच व बोर व्याघ्र प्रकल्प, नागपूर
१४) वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्प, चंद्रपूर
१५) वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, सहयाद्री व्याघ्र प्रकल्प, कोल्हापूर
१६) वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, नवेगाव-नागझिरा व्याघ्र प्रकल्प, गोंदिया
१७) उपवनसंरक्षक (प्रादेशिक) सर्व.
१८) उपवनसंरक्षक (वन्यजीव) ठाणे.
१९) महालेखापाल-१/२ (लेखापरीक्षण /लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य , मुंबई / नागपूर.
२०) वित्त विभाग (व्यय-१० कार्यासन), मंत्रालय, मुंबई - ३२.
२१) वन कक्षातील सर्व कार्यासने, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२२) फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२ (निवडनस्ती).